ता.भुदरगड, जिल्हा कोल्हापूर येथील मेघोली लघु पाटबंधारे तलाव, फुटीबाबतची कारणे शोधण्यासाठी व उपाययोजना सुचविण्यासाठी समिती गठीत करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३०१/२१/सिंव्य (कामे)**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : ३०/१२/२०२१

**प्रस्तावना :-**

लघु पाटबंधारे तलाव मेघोली, ता.भुदरगड, जिल्हा कोल्हापूर या प्रकल्पाचे धरण दि.०१/०९/२०२१ रोजी रात्री १० ते ११ च्या दरम्यान फुटले. सदर दुर्घटनेचा प्राथमिक अहवाल व विस्तृत अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. सदर दुर्घटनेची कारणे शोधणे व उपाय योजना सुचविणेबाबत समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दि.०१/०९/२०२१ रोजी रात्री १० ते ११ च्या दरम्यान लघु पाटबंधारे तलाव मेघोली, ता.भुदरगड, जिल्हा कोल्हापूर या प्रकल्पाचे धरण फुटीबाबतची कारणे शोधणे, त्यानुषंगाने उपाययोजना ठरवणे व मार्गदर्शक सूचना प्रस्तावित करण्यासाठी खालीलप्रमाणे तांत्रिक समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना नाशिक | अध्यक्ष |
| २ | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे | सदस्य |
| ३ | अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, नाशिक | सदस्य |
| ४ | अधीक्षक अभियंता (धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना नाशिक | सदस्य |
| ५ | अधिक्षक अधीक्षक अभियंता, गुणनियंत्रण मंडळ, पुणे | सदस्य |
| ६ | अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर | सदस्य |
| ७ | वरिष्ठ भुवैज्ञानिक, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना नाशिक | सदस्य |
| ८ | कार्यकारी अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे विभाग (दक्षिण), कोल्हापूर | सदस्य सचिव |

२. या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे आहे :-

१) ल.पा.तलाव मेघोली, ता.भुदरगड, जिल्हा कोल्हापूर, धरण फुटून झालेल्या दुर्घटनेची तांत्रिक कारणमिमांसा शोधणे.

२) ल.पा.तलाव मेघोली, ता.भुदरगड, जिल्हा कोल्हापूर या तलावाबाबत निदर्शनास आलेल्या त्रृटी निश्चित करणे व सदर प्रकारच्या दुर्घटना टाळण्यासाठी आावश्यक मार्गदर्शक सूचना सुचविणे.

३) ल.पा.तलाव मेघोली, ता.भुदरगड, जिल्हा कोल्हापूर, प्रकल्पाच्या धरण फुटीच्या अनुषंगाने धरण सुस्थितीत आणणेसाठी कायमस्वरूपी उपाययोजना सुचविणे.

३. समितीच्या रचनेत समाविष्ट असलेल्या समितीमधील सदस्यांव्यतिरिक्त जलसंपदा विभाग व इतर विभागातील अधिकारी /कर्मचारी यांना बैठकीकरीता आमंत्रित करण्याची मुभा समितीस राहील.

४. उपरोक्त समिती ता.भुदरगड, जिल्हा कोल्हापूर येथील लघु पाटबंधारे तलाव फुटीबाबतचा अहवाल दोन महिन्यांच्या कालावधीत शासनास सादर करील.

५. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२११२३०१२२३३९०२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2bf9216e9c82a387001366ade405f96dced8f883099a0df6eda6dcc4a3cecb0, serialNumber=64cd9fc7921db221846e464a04d2971a520aa1ed7e728a92a64c735ef2ea7cc9, cn=Vaijnath Manmathappa Chille
Date: 2021.12.30 12:24:26 +05'30'

**(वैजनाथ चिल्ले)**

**उप सचिव**

**प्रति,**

१. मा.मुख्यमत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मुख्य सचिवांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महासंचालक, मेरी, नाशिक,
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१०. मुख्य अभियंता (जलसंपदा विभाग), पुणे
११. मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना नाशिक,
१२. अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, नाशिक
१३. अधीक्षक अभियंता (धरण), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना नाशिक,
१४. अधीक्षक अभियंता, गुणनियंत्रण मंडळ, पुणे,
१५. अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर
१६. वरिष्ठ भुवैज्ञानिक, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना नाशिक,
१७. कार्यकारी अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे विभाग (दक्षिण), कोल्हापूर
१८. सिंव्य (कामे) कार्यासन संग्रहार्थ.